राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौ.डोणगाव ( ता. मेहकर, जि. बुलडाणा ) नळ पाणीपुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राग्रापे-२०१८/प्र.क्र.१८५/ पापु-१३**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ११ मार्च, २०२०

वाचा

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलडाणा यांचे क्र. बुजिप/ग्रापापुवि/कार्या-१/ताशां-४/४०००/२०१८, दिनांक २८.१२.२०१८ रोजीचे पत्र
२) मुख्य अभियंता( नागरी व ग्रामीण), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे यांचे तांत्रिक मान्यता आदेश क्रमांकः मजीप्रा/मु.अ(नवग्रा)/तांशा.१/१०८८, दि.२२.०३.२०१३
३) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. निविदा-२११४/प्र.क्र.३४०/पापु-१३, दिनांक २१.०५.२०१५ चे पत्र.
४) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती यांचे सुधारीत तांत्रिक मान्यता आदेश क्रमांकः भानिक/अम/लेखा/तां.मं/२६९०/२०१८, दि. ०१ डिसेंबर, २०१८
५) वित्त विभागाचे क्र. व्यअस-२०२०/प्र.क्र.८/अर्थ-२, दिनांक ०३ मार्च, २०२० चे पत्र व सोबतचे व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना:-**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत संदर्भाधीन क्र. २ येथील पत्रान्वये मौ. डोणगांव (ता. मेहकर, जि. बुलडाणा) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. ४४२.६१ लक्ष इतक्या ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे व ग्रामसभेने प्रशासकीय मान्यता दिलेली आहे. शासनाने संदर्भ क्र. ३ च्या पत्रान्वये जादा दराच्या निविदेस मान्यता दिलेली आहे. संदर्भ क्र.४ च्या पत्रान्वये सदर योजनेच्या रु.७५७.७२ लक्ष इतक्या रकमेच्या सुधारीत प्रस्तावास मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, अमरावती यांनी तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलडाणा यांनी त्यांच्या सदर्भ क्र.१ च्या पत्रान्वये रु. ७५७.७२ लक्ष (ढोबळ) इतक्या किंमतीचे सुधारित अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केले आहे. सदर सुधारित अंदाजपत्रकास नियोजन विभाग व वित्त विभागाच्या व्यय अग्रक्रम समितीने मान्यता दिलेली आहे.

त्यानुसार मौ. डोणगांव (ता. मेहकर, जि. बुलडाणा) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारित अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

उपरोक्त प्रस्तावनेत नमुद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, मौ. डोणगांव ( ता. मेहकर, जि. बुलडाणा ) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. ७५७.७२ लक्ष (रु. सात कोटी सत्तावन्न लक्ष बहात्तर हजार फक्त ) इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत पुढील अटींच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) ही योजना जिल्हा परिषद, बुलडाणा यांच्या मार्फत कार्यान्वित करण्यात येईल.

२) या योजनेच्या मूळ प्रशासकीय मंजुरी दिलेल्या शासन निर्णयातील व तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे.

**३) सदर योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहित निविदा कार्यपद्धती अनुसरण्याची सर्वस्वी जबाबदारी जिल्हा परिषद, बुलडाणाची राहिल.**

**४) सदर सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी, निविदा विषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहित धरली जाणार नाही. अशा प्रकरणांची तपासणी शासनाच्या प्रचलित नियमानुसार करण्यात येईल.**

५) सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणीपुरवठा योजना या देखभाल दुरुस्ती अभावी वीजदेयके न भरल्यामुळे बंद पडल्या असल्याचे दिसून येते. त्यामुळे सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्यासाठी पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वेळोवेळी वाढ करण्यात यावी.

६) योजनेची चाचणी घेतल्यानंतर योजना संबंधित ग्रामपंचायतीकडे/जिल्हा परिषदेकडे हस्तांतरित करुन लेखे बंद करण्यात यावेत.

७) योजना राबविणे त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/ जिल्हा परिषदेस/महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास शासनाकडून कोणतीही मदत/अनुदान मिळणार नाही.

८) योजना पुनर्सुधारित होणार नाही, याची जबाबदारी जिल्हा परिषद, बुलडणा यांची राहिल.

२. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही नियोजन विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. २०२/१९/व्यय-३, दि.०८/०८/२०१९ नुसार व वित्त विभागाच्या व्यय अग्रकम समितीच्या दिनांक १३.०२.२०२० रोजीच्या बैठकीच्या इतिवृत्तातील निर्देशानुसार देण्यात येत आहेत.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३११११५००१५७५२८असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ram Apparao Sabane

Digitally signed by Ram Apparao Sabane
DN: CN = Ram Apparao Sabane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2020.03.11 15:37:32 +05'30'

**(रा. अ. साबणे)**

**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्य मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलडाणा
६) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
७) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती.
८) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
९) संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन बेलापूर, नवी मुंबई.
१०) कार्यकारी अभियंता महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बुलडाणा.
११) निवड नस्ती (पापु-१३)